# अंतराळात अजून एक जीवसृष्टी आहे का?

फ्रँकलिन ब्रॅनली
चित्र: एड्वर्ड मिलर

# अंतराळात अजून एक जीवसृष्टी आहे का?

फ्रँकलिन ब्रॅनली

चित्र: एड्वर्ड मिलर

मराठीत प्रभाकर नानावटी



अंतराळात अजून एक

जीवसृष्टी आहे का?





प्राणी-पक्षी, क्रिमी-कीटके, झाडे, फूल-फळ देणारी
झाडे, माणसं आणि अशाच प्रकारचे कित्येक सजीव या
पृथ्वी नावाच्या ग्रहावर वास करत आहेत.
असलेच सजीव आणखी कुठे तरी असतील का?
वनस्पती व प्राणी चंद्रावर असतील का? मंगळ किंवा
गुरु ग्रहावर? नाही तर अंतराळातील कुठे तरी लांब
असलेल्या ताऱ्यावर वास करत असतील का?
अशा प्रकारची प्रश्नं कित्येक वर्षांपासून लोक
विचारत आले आहेत.
तुम्हालासुद्धा याबद्दल नक्कीच कुतूहल असणार.

शंभरेक वर्षांपूर्वी चंद्रावर वनस्पती व प्राणी आहेत अशा बातम्या झळकत होत्या. खगोलशास्त्रज्ञ त्यांच्या मोठमोठ्या व नवीन टेलीस्कोपमधून हे सर्व पाहू शकतात अशा बातम्या वर्तमानपत्रात छापल्या जात होत्या. चंद्रावर झाडं आहेत, त्यांना फळ येतात, लहान लहान म्हशी आहेत, त्या झाडाखाली चरत आहेत, अस्वलासारखा प्राणी मागील दोन पायानी चालत आहे, इ.इ. बातम्या रेडियो व वृत्तपत्रातून प्रसरविल्या जात होत्या.



तेथे माणसं (चंद्रमानव) आहेत, त्यांच्या अंगावर केस आहेत, त्यांना पंख आहेत, ते झाडाखाली बसून फळं खात आहेत, अशाही बातम्या वृत्तपत्रात तिखट-मीठ लावून सांगितल्या जात होत्या.

या गोष्टीत काही तथ्य नव्हते. तरीसुद्धा लोकं कित्येक वर्षे चंद्रमानवांच्या अस्तित्वावर विश्वास ठेवत होते.



त्याचबरोबर मंगळ ग्रहावरील मार्शियन पृथ्वीवर उतरले आहेत, या रेडियो बातमीवरसुद्धा लोकांचा विश्वास होता. मार्शियनचे डोके मोठे व शरीर एकदम छोटे असे त्यांचे वर्णन केले जात होते. ते अंतरिक्षयानातून उतरले आहेत, त्यांना कुणाशी मैत्री केलेले आवडत नाही, शहर व खेड्या-पाड्यात जाऊन ते हल्ला करत आहेत, अशा प्रकारच्या अफवा त्याकाळी पसरविल्या जात होत्या. .

१९६०च्या दशकापर्यंत चंद्रमानव व मार्शियन आहेत यावर लोकांचा भलताच विश्वास होता. परंतु १९६९नंतर मात्र चंद्रावर जीवसृष्टी नाही याची खात्री पटली. त्या वर्षी नील आर्मस्ट्राँग व एड्विन आल्ड्रिन चंद्रावर पाय ठेवून काही पावलं चालून परत पृथ्वीवर आले होते.





ते परत आल्यानंतर कित्येक अंतराळवीर चंद्रावर जाऊन परत आले. त्यांनी भरपूर शोध घेतला तरी कुठेही कुठलाही जीव त्यांना सापडला नाही.  कुठेही वनस्पती वा प्राणी सापडला नाही. चंद्र हा एक मृतप्राय ग्रह होता व आजही आहे.

परंतु एवढ्यावरून पूर्ण सौरमालिकेतील कुठल्याही ग्रहावर जीवसृष्टी नाही असे म्हणू शकत नाही. मंगळ ग्रह कित्येक विषयात आपल्यासारखाच ग्रह आहे. तेथे प्राणी व/वा वनस्पती असू शकतील. तिखट मीठ लावून सांगितलेल्या गोष्टी प्रमाणे मोठे डोके व लहान शरीर असलेले प्राणी नसतीलही. परंतु प्राणी नक्कीच असावेत.

मंगळ ग्रहाचे फोटो पाहिल्यानंतर काही ठिकाणी पाणी वाहत आहे हे लक्षात येईल. जिथे पाणी आहे तिथे जीवश्सृष्टी असायला हवी. या पूर्वी केव्हातरी तेथे सजीव असतील का? आताही असतील का?

याची खात्री करून घेण्यासाठी प्रोब पाठवून शेकडो फोट काढण्यात आले. तेथील मातीवर प्रयोग करण्यात आले. परंतु फोटोमध्ये वा मातीच्या परीक्षणावरून तेथे कुठलाही जीव नाही याची खात्री पटली.



ON MARS मंगळ ग्रहावर












इतर ग्रहांची स्थिती काय? बुध वा शुक्र ग्रहावर सजीव असू शकतील.

बुध ग्रहाच्या अगदी जवळ जाऊन बघण्यासाठी प्रोब पाठविले. त्यानी शेकडोनी फोटो काढले. तेथेही सजीव असण्याची शक्यता दुरावली.

चंद्राप्रमाणे हाही ग्रह मृतप्राय आहे. त्यातही तेथील उष्णता भरपूर. त्या उष्णतेत कुठलाही जीव जिवंत राहूच शकत वाही.





शुक्र ग्रहावरही प्रोब पाठविण्यात आले. तेथील टोकाच्या उष्णतेमुळे प्रोब जळून खाक झाले. शिवाय तेथील विषारी वायूमुळे कुठलाही जीव जिवंत राहूच शकत नाही. तेथे कुठलाही जीव असलेल्याच्या खुणा सापडल्या नाहीत.




सौरमालिकेतील इतर ग्रहावर सजीव असू
शकतील अशी कुणीच अपेक्षा करणार नाहीत.
सूर्य
SUN
Mercury
बुध
Venus
शुक्र
Earth
पृथ्वी
Ma
मंगळ
Jupiter
गुरु
Saturn
शनी
Uranus
युरेनस
Neptune
नेप्च्यून
Pluto
प्लूटो
गुरु, शनी, युरेनस, नेप्च्यून हे ग्रह वायूतून निर्माण झाले आहेत.
शिवाय हे सर्व थंड असलेले ग्रह आहेत. पृथ्वीवरील काही
भागात असलेल्या थंडीपेक्षा जास्त थंड. अगदी लहान
असलेला प्लुटो ग्रहसुद्धा तितकाच थंड. त्यामुळे
सौरमालिकेतील पृथ्वी सोडून इतर कुठल्याही ग्रहावर
जीवसृष्टी नसणार.
22



परंतु सौरमालिकेच्या पलिकडे लाखो-करोडो
तारे आहेत.सूर्याभोवती प्रदक्षिणा घातल्यासारखे या
ताऱ्यांच्या भोवती प्रदक्षिणा घालणारे तारे असू शकतील.
त्या ग्रहावर वनस्पती व प्राणी असू शकतील.
त्यांना नीटपणे पाहू न शकल्यामुळे खात्रीपूर्वक आपण
काही सांगू शकत नाही.

हे प्राणी आपल्याला माहित नसलेल्या जगात राहत असल्यास ते आपल्या जगातील प्राणी वा वनस्पतीपेक्षा वेगळे दिसत असतील. मोठे डोक्याचे व लहान शरीराचे ते असू शकतील. चंद्रमानवाप्रमाणे त्यांना पंख असू शकतील. जाड पाय व बारीक हात असलेले ते असू शकतील. ते चारी पायावर चालत असतील.  आपण कल्पनाही करू शकणार नाही असे ते असू शकतील.

कुणास ठाउक ?

या प्रकारच्या विषयांचा अभ्यास करणारे तज्ज्ञ सौरमालिकेच्या पलीकडे प्राणीवंश आहे यावर विश्वास ठेवणार नाहीत. अजून काहींना हा सर्व कल्पनाविलास आहे असे वाटेल. परंतु मला तसे वाटत नाही.

आपल्या सौरमालिकेच्या पलीकडे अब्जांनी तारे आहेत. कुठे तरी आपल्यासारखे प्राणी व वनस्पती असलेले जग  नक्कीच असू शकेल.  तेथील माणसांना आपल्यासारखे अनेक विषय माहित असतील. कदाचित ते आपल्यापेक्षा जास्त बुद्धिमान असू शकतील.

कधीतरी आपण त्यांच्या  बरोबर संवाद करू शकू.











या नंतरच्या शेकडो वर्षानंतर कदाचित आपण अंततिक्षयानात बसून अगदी लांबवर असलेल्या ग्रहापर्यंत पोचू शकू, असे मला वाटते.

तुम्हाला काय वाटते?



## अंतराळातील जीवसृष्टीबद्दल जास्त माहिती करून घेण्यासाठी

- अंतरिक्षातील इतर तारांगणात जीवसृष्टी आहे की नाही या मोहिमेवर जाताना तुम्ही कुठल्या प्रकारचे कपडे घालणार याचे वर्णन करा. सर्व साधन सुविधा मिळत असलेल्या पृथ्वीवर तुम्ही नाही हे लक्षात ठेवा. तुमचे कपडे हवा, पाणी, आहार अती उष्णता व कडाक्याची थंडी इत्यादीपासून रक्षण करणारी असावी हे लक्षात ठेवा

- बाह्य जगातील माणूस भेटल्यावर त्याच्याशी कशा प्रकारे संवाद करणार? तुमच्या बद्दल, तुम्ही रहात असलेल्या जगाबद्दल काय काय सांगणार आहात? त्या जगातील जीवन इथल्यासारखे असेल की वेगळे असेल?
- तुम्ही नवीन ग्रहाचा शोध लावल्यास तो ग्रह कसा असेल याची कल्पना करून त्याचे वर्णन करा. तेथील सजीव प्राणी कसे दिसतील? तेथे पक्षी, मधमासे, ढेकूण असतील का? सजीवांचा आहार कसा असेल? त्यांचे चालणे कसे असेल?
- जवळच्या प्लानिटोरियमला भेट द्या. तेथे इतर ग्रहाबद्दल जास्त माहिती मिळेल.

